**संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test)**
**उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
**माहिती तंत्रज्ञान संचालनालय**
**शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती ०४/१४/३९,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ फेब्रुवारी,२००४

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-१०००/प्र.क्र.१४३/३९, दि. १०.७.२०००
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.५/२००१/३९, दि. २०.७.२००२
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मातंसं/प्र.क्र.०३/६५/३९, दि. १७.५.२००३

**प्रस्तावना :-** शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याबाबतच्या धोरणात्मक निर्णयास अनुसरुन शासकीय कामकाजात संगणकाचा परिणामकारकरित्या वापर होण्यासाठी प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी उपलब्ध होण्यासाठी संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम देण्याचाही निर्णय घेतला होता. परंतु शासन निर्णय , सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण-१०००/प्र.क्र.१४३/३९, दि. १०.७.२००० नुसार ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी प्रोत्साहनात्मक रक्कम व संगणक प्रशिक्षण खर्च घेतलेला आहे अथवा अशा रकमेची मागणी केलेली आहे त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळामार्फत घेतली जाणारी चाचणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक करण्यात आले आहे.

२. दि. १७.५.२००३ च्या शासन निर्णयान्वये शासकीय सेवेतील गट **अ**, गट **ब** व गट **क** मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक चाचणी परीक्षेचे प्रमाणपत्र सादर करण्यासाठी दि.२०.१.२००४ पर्यन्त मुदत देण्यात आलेली होती. परंतु शासनाकडे उपलब्ध असलेली संगणक संख्या व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांची संख्या विचारात घेता राज्यातील सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेस पुरेसा अवधि देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

***शासन निर्णय :--***

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सध्या शासकीय सेवेत असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र प्राप्त करुन शासनास प्रमाणपत्र सादर करावयाचा दिनांक शासन निर्णय क्रमांक : मातंसं/प्र.क्र.०३/६५/३९, दि. १७ मे,२००३ अन्वये २०.१.२००४ असा पूर्वी निश्चित करण्यात आला होता. तथापि या शासन निर्णयाव्दारे शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र सादर करण्यास मुदतवाढ देण्यात आली असून **संगणक चाचणीचे विहित प्रमाणपत्र शासनास सादर करण्याचा अंतिम दिनांक २०.७.२००४ असा निश्चित करण्यात आला आहे.**

शासन निर्णय, दिनांक २०.७.२००२ मधील इतर बाबी कायम राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सोनाली मुळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,